भूजल सर्वेक्षण व विकास यंत्रणेतील प्रशासन अधिकारी (गट-अ) संवर्गातील अधिकाऱ्यांची तात्पुरती अंतिम ज्येष्ठतासूची
(दि.०१ जाने, २०१२ ते दि.०१ जाने, २०२१)

# महाराष्ट्र शासन

## पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग

## शासन परिपत्रक क्रमांकः आपना-०२१८/प्र.क्र.२३४/पापु-१५

सातवा मजला, गोकुळदास तेजपाल रुग्णालय इमारत, क्रॉफर्ड मार्केट जवळ,
लोकमान्य टिळक मार्ग, नवीन मंत्रालय इमारत, मुंबई- ४०० ००१
तारीख: ०८ मार्च ,२०२२

**वाचा :**

१) **शासन परिपत्रक, सामान्य प्रशासन विभाग, क्रमांकः** एसआरव्ही-२०१६/प्र.क्र.२८४/१२, दिनांक २१ ऑक्टोबर, २०११
२) शासन परिपत्रक, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, क्रमांकः आपना-२८१२/ प्र.क्र.१६३/पापु-१५, दिनांक १६ जून, २०१२.
३) शासन परिपत्रक, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, क्रमांकः आपना-०२१८/ प्र.क्र.२३४/पापु-१५, दिनांक ३० ऑगस्ट, २०१८.
४) सामान्य प्रशासन विभाग,अधिसूचना क्रमांक: एसआरव्ही-२०११/प्र.क्र.२८१/बारा, दिनांक २१/०६/ २०११
५) शासन परिपत्रक, सामान्य प्रशासन विभाग, क्रमांकः एसआरव्ही-२०१६/प्र.क्र.२८१/कार्या-१२, दिनांक १३ जुलै,२०२१
६) शासन परिपत्रक, क्रमांकः आपना-०२१८/प्र.क्र.२३४/पापु-१५ दि. ०२/०२/२०२१

**शासन परिपत्रक :**

सामान्य प्रशासन विभागाने शासन सेवेतील अधिकारी/ कर्मचारी यांची प्रत्येक वर्षी ज्येष्ठता सूची तयार करणे व प्रसिध्द करणे यासाठी संदर्भाधीन क्रमांक १ येथील शासन निर्णयान्वये सर्वंकष धोरण तयार केले आहे. तदनंतर सदर धोरण संदर्भाधीन क्रमांक ४ व ५ अन्वये सुधारीत केलेले आहे. भूजल सर्वेक्षण आणि विकास यंत्रणेतील प्रशासन अधिकारी (गट-अ) संवर्गाची दिनांक ०१/०१/२०११ रोजीची अंतिम ज्येष्ठतासूची संदर्भाधीन क्रमांक २ येथील शासन परिपत्रकान्वये प्रसिध्द करण्यात आली आहे. तसेच दिनांक ०१/०१/२०१२ ते दिनांक ०१/०१/२०१८ रोजीची तात्पुरती सामायिक ज्येष्ठतासूची उपरोक्त संदर्भाधीन क्रमांक ३ व दि. ०१.०१.२०१९ ते ०१.०१.२०२१ रोजीची तात्पुरती सामायिक ज्येष्ठतासूची उपरोक्त संदर्भाधीन क्र. ६ येथील शासन परिपत्रकान्वये तयार करण्यात आली आहे. सदर तात्पुरत्या ज्येष्ठतासूची बाबत प्राप्त आक्षेपांचा विचार करून भूजल सर्वेक्षण आणि

विकास यंत्रणेतील प्रशासन अधिकारी (गट-अ) संवर्गाची दि.०१/०१/२०१२ चे दिनांक ०१/०१/२०२१ रोजीची स्थिती दर्शविणारी तात्पुरती अंतिम ज्येष्ठतासूची तयार करण्यात आली आहे. सदर ज्येष्ठतासूची या परिपत्रकासोबत जोडपत्र-अ म्हणून जोडण्यात येत आहे.

सदर ज्येष्ठतासूची मा. सर्वोच्च न्यायालय येथे प्रलंबित विशेष अनुज्ञा याचिका क्र. २८३०६/२०१७ मधील निकालाच्या अधीन राहतील

आयुक्त भूजल सर्वेक्षण आणि विकास यंत्रणा, भूजल भवन, शिवाजीनगर, पुणे यांना कळविण्यात येते की, सदर परिपत्रक हे यासोबतच्या ज्येष्ठतासूचीत समाविष्ट असलेल्या व आपल्या विभागाय कार्यरत असलेल्या, यंत्रणेच्या अधिनस्त कार्यालयात कार्यरत असलेल्या, सेवेतून सेवानिवृत्त झालेल्या तसेच यंत्रणेच्या आस्थापनेवरून प्रतिनियुक्तीवर असलेल्या अथवा अन्य मार्गाने संवर्ग बदललेल्या सर्व अधिका-यांच्या निदर्शनास आणावे.

जेष्ठता सूचीमधील अधिकाऱ्यांच्या नावासमोर नमूद केलेला जेष्ठता दिनांक फक्त प्रशासन अधिकारी संवर्गातील जेष्ठता निश्चित करण्यासाठी विचारात घेण्यात येईल. इतर कोणत्याही आर्थिक फायद्यासाठी तो दिनांक गृहीत धरला जाणार नाही.

सदर शासन परिपत्रक महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आले असून त्याचा संकेताक २०२२०३०८१२३८५९७२२८ असा आहे. हे परिपत्रक डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Ganesh Nivrutti Pawar

Digitally signed by Ganesh Nivrutti Pawar
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=Water Supply And Sanitation Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=805bdef8ce1424c02121cece0d20e917ffa1ef512d7e8fa2e49d93adbb5ad352, serialNumber=1325a2533f628572438b5fb711c805de49788678b97015bb0cac990e3b375423, cn=Ganesh Nivrutti Pawar
Date: 2022.03.10 17:42:41 +05'30'

**(गणेश पवार)**
अवर सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रत,**

१. संचालक, भूजल सर्वेक्षण आणि विकास यंत्रणा, शिवाजीनगर, पुणे.
२. उप सचिव (कार्यासन -१२), सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई.
३. उपसंचालक, भूजल सर्वेक्षण आणि विकास यंत्रणा (सर्व).
४. प्रशासन अधिकारी, भूजल सर्वेक्षण आणि विकास यंत्रणा, पुणे.
५. सहाय्यक प्रशासन अधिकारी, भूजल सर्वेक्षण आणि विकास यंत्रणा (सर्व).
६. निवड नस्ती (कार्यासन पापु-१५), पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग.

शासन परिपत्रक क्र.आपना-०२१८/प्र.क्र.२३४/पापु-१५, दिनांक: ०८ मार्च, २०२२ सोबतचे परिशिष्ट-“अ”

**परिशिष्ट-अ**

भूजल सर्वेक्षण आणि विकास यंत्रणेतील “प्रशासन अधिकारी (गट-अ)” संवर्गातील अधिकाऱ्यांची दि.०१/०१/२०१२, दि.०१/०१/२०१३, दि.०१/०१/२०१४, दि.०१/०१/२०१५, दि.०१/०१/२०१६, दि.०१/०१/२०१७, दि.०१/०१/२०१८, दि. ०१/०१/२०१९, दि. ०१/०१/२०२० व दि. ०१/०१/२०२१ रोजीची तात्पुरती अंतिम ज्येष्ठतासूची.

| **प्रशासन अधिकारी संवर्गाची दिनांक ०१/०१/२०१२, दि.०१/०१/२०१३ व दि. ०१/०१/२०१४ ची तात्पुरती अंतिम ज्येष्ठतासूची** | | | | | | | | | |
|---|---|---|---|---|---|---|---|---|---|
| ज्येष्ठता क्रमांक | अधिका-याचे नाव | प्रशासन अधिकारी पदावर नियुक्तीचा मार्ग | जन्म दिनांक | प्रवर्ग | प्रशासन अधिकारी पदावर प्रत्यक्ष रुजू दिनांक | प्रशासन अधिकारी पदावर ज्येष्ठता दिनांक / ज्येष्ठतेचा मानीव दिनांक | सेवानिवृत्तीचा दिनांक | शैक्षणिक अर्हता | शेरा |
| **१** | **२** | **३** | **४** | **५** | **६** | **७** | **८** | **९** | **१०** |
| १ | निरंक | -- | -- | -- | -- | -- | -- | -- | -- |

| **प्रशासन अधिकारी संवर्गाची दिनांक ०१/०१/२०१५, दि.०१/०१/२०१६, दि. ०१/०१/२०१७, दि.०१/०१/२०१८, दि. ०१/०१/२०१९, दि. ०१/०१/२०२० व दि. ०१/०१/२०२१ ची तात्पुरती अंतिम ज्येष्ठतासूची** | | | | | | | | | |
|---|---|---|---|---|---|---|---|---|---|
| ज्येष्ठता क्रमांक | अधिका-याचे नाव | प्रशासन अधिकारी पदावर नियुक्तीचा मार्ग | जन्म दिनांक | प्रवर्ग | प्रशासन अधिकारी पदावर प्रत्यक्ष रुजू दिनांक | प्रशासन अधिकारी पदावर ज्येष्ठता दिनांक / ज्येष्ठतेचा मानीव दिनांक | सेवानिवृत्तीचा दिनांक | शैक्षणिक अर्हता | शेरा |
| **१** | **२** | **३** | **४** | **५** | **६** | **७** | **८** | **९** | **१०** |
| १ | श्री. विजय पोपट जानराव | पदोन्नती | १४ मार्च, १९६४ | अ.जा. | ३ मे २०१४ | ३० एप्रिल, २०१४ | ३१ मार्च, २०२२ | बी.ए. | -- |